**निविदा/ करारनामा प्रारुपामध्ये, लवादाच्या आदेशानुसार कार्य/ सेवा कंत्राटाच्या अनुषंगाने विलंबाने होणारे प्रदान / न्यायालयीन प्रकरणानुसार करावयाचे प्रदान अशा प्रकरणी व्याजदराची तरतूद निविदा / करारनाम्यामध्ये समाविष्ट करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- निविदा-२०२३/प्र.क्र.१/व्यय-११**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०६ जून, २०२३.

**प्रस्तावना:-**

सार्वजनिक बांधकाम विभाग, जलसंपदा विभाग व अन्य विभागामार्फत निविदा काढून विविध कामे करण्यात येतात तसेच विविध सेवा घेण्यात येतात. या कामांची / सेवांची देयके अदा करताना विविध कारणाने विलंब होतो. विलंब झाल्याने कंत्राटदार देयकाची रक्कम व्याजासहित मिळण्यासाठी न्यायालयात अथवा लवादापुढे जातात. विलंबाने होणारे प्रदानाच्या अनुषंगाने लवादाच्या आदेशानुसार व न्यायालयाच्या आदेशानुसार शासनास व्याजासहित देयके अदा करावी लागतात. व्याजाचा दर, लवाद अथवा न्यायालय प्रकरणपरत्वे व तत्कालीन परिस्थितीनुसार ठरविते. सदरचा दर रिझर्व्ह बँकेने निश्चित केलेल्या दरापेक्षा जास्त असल्याने शासनास खूप मोठा आर्थिक भुर्दंड सोसावा लागतो. या अनुषंगाने, शासनाकडून विलंबाने अदा करावयाच्या देयकांकरिता निविदा व करारनाम्यामध्ये व्याज दर नमूद करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभाग, जलसंपदा विभाग व अन्य विभागामार्फत निविदा अटी शर्तीमध्ये लवादाची तरतूद असते. अशा कार्य / सेवा कंत्राटाच्या अनुषंगाने विलंबाने होणारे प्रदान, लवादाच्या आदेशानुसार करावयाचे प्रदान, न्यायालयीन प्रकरणानुसार करावयाची प्रदाने इत्यादी बाबतीत व्याजाची रक्कम ही NHAI (National Highways Authority of India) प्रकल्पामधील सवलत करारनाम्यातील तरतुदीनुसार रिझर्व बँकेने वेळोवेळी जाहिर केलेले **बँक दर + ३ टक्के प्रती वर्ष,** या दराने असेल अशी स्पष्ट तरतुद निविदाच्या अटी व शर्तीमध्ये तसेच त्या अनुषंगाने करण्यात येणा-या करारनाम्यामध्ये विनिर्दिष्टपणे नमूद करण्यात यावी.

३. प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, सदर आदेशातील तरतुदींनुसार विभागांनी कार्यवाही करावी. कार्यवाही करणेबाबत अधिनस्त कार्यालयांना कळविण्यात यावे. याबाबत आवश्यक त्या सुधारणा यापुढे प्रसिध्द करण्यात येणाऱ्या निविदा तसेच, करारनाम्यामध्ये विनिर्दिष्टपणे केली जाईल, याची दक्षता सर्व मंत्रालयीन विभागांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा सांकेताक २०२३०६०६१६२७३३०३०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AJAY PANDURANG WAGH
Date: 2023.06.06 16:34:04 +05'30'

**(अ. पां. वाघ)**
**उप सचिव, वित्त विभाग**

**प्रत :-**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३) मा. उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननीय महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधान सभा व संसद सदस्य,
८) सर्व मा. मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
११) सह सचिव / उप सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) प्रधान महालेखापाल- १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१३) प्रधान महालेखापाल- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-३२.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-३२.
१६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई-३२.
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी......
१८) निवड नस्ती, व्यय-११, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****